**शासकीय वैद्यकीय/दंत/आयुर्वेद महाविद्यालये व रुग्णालयांमध्ये एन.आय.सी. ने विकसित केलेली NextGen e-hospital ही आरोग्य सेवा व्यवस्थापन प्रणाली (एच.एम.आय.एस.) कार्यान्वित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

### वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

### शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र. ५८/प्रशा-२

९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
नविन गो. ते. संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ जुलै २०२३

<u>वाचा :-</u>

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: सीओएम-१०९८/प्र.क्र.२१२/९८/३९, दिनांक ०५.१०.२००१.
२) वैद्यकीय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: ईएसटी/२४०३/३५५८/प्र.क्र.०७/आस्थापना/संकनि./०६, दिनांक १३.०७.२००६.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मातसं २०११/प्र.क्र.१२५/३९, दिनांक २३.०९.२०११
४) वैद्यकीय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: वैशि-२०१५/प्र.क्र.१६५/१५/आस्था, दिनांक १०.०७.२०१५.
५) आयुक्त, वै. शि. यांचे परिपत्रक क्र:डीएमईआर-१२०२२/२/२०२२-ईडीयु, दिनांक ०५.०७.२०२२
६) आयुक्त, वै. शि. यांचे पत्र क्रमांक: डीएमईआर-१२०३१/१/२०२२-ईडीयु/४३३, दिनांक १५.०२.२०२३.
७) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक २७.०३.२०२३ व दिनांक २४.०५.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना:-</u>

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिपत्याखालील १४ शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये प्रशासन अधिक गतिमान, लोकाभिमुख, पारदर्शक व लोककल्याणकारी करणे, शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील सर्व शैक्षणिक बाबींमध्ये तसेच सर्व कामकाजामध्ये माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन इलेक्ट्रीक मेडीकल रेकॉर्ड निर्माण करण्याच्या दृष्टीने दिनांक १३.०७.२००६ च्या शासन निर्णयान्वये मे. हॅवलेट पॅकर्ड इंडिया सेल्स प्रा. लि. (बदललेले नाव ईआयटी सर्विसेस प्रा. लि.-सध्या DXC pvt.ltd.) या सेवा पुरवठादारासोबत करार (मास्टर सर्व्हिस ॲग्रिमेंट) करुन आरोग्य सेवा व शैक्षणिक व्यवस्थापन प्रणाली (HMIS) कार्यान्वित करण्यात आली होती. सदर प्रकल्पाचा करार कालावधी समाप्त झाल्यानंतर, संचालनालयामार्फत सदर प्रणालीचे करण्यात आलेल्या लेखा परिक्षणामध्ये आढळून आलेल्या त्रुटी तसेच सदर सेवा पुरवठादाराने मा. उच्च

न्यायालयात दाखल केलेली याचिका विचारात घेऊन, संचालनालयाने दिनांक ०५.०७.२०२२ रोजीच्या आदेशान्वये सदर प्रकल्पाच्या सेवा बंद करण्यात आल्या आहेत. नॅशनल डिजीटल हेल्थ मिशन अंतर्गत राज्यातील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये ही केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण विभागास जोडली जाणार आहेत. याकरिता प्रबळ व सुयोग्य HMIS प्रणाली विकसित करणे अत्यंत आवश्यक आहे. यास्तव NIC मार्फत विकसित केलेल्या NextGen e-Hospitals ही अद्यावत प्रणाली शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांकरीता उपलब्ध करुन घेण्यास व त्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संचालनालयाने दिनंक १५.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक ०५.१०.२००१ अन्वये गठीत करण्यात आलेल्या मा. मुख्य सचिव (महाराष्ट्र राज्य) यांच्या अध्यक्षतेखालील माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या उच्चाधिकार समितीच्या दिनांक २७.०३.२०२३ व दिनांक २४.०५.२०२३ रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. विभागाने सादर केलेल्या प्रस्तावास उच्चाधिकार समितीने मान्यता प्रदान केली आहे. त्यानुषंगाने पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

मुख्य सचिव (म. रा.) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक २४.०५.२०२३ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीमध्ये उच्चाधिकार समितीने प्रदान केलेल्या मान्यतेनुसार, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालयांमध्ये एन.आय.सी मार्फत विकसित करण्यात आलेली NextGen e-Hospitals ही अद्यावत प्रणाली कार्यान्वित करण्यास (प्रकल्प सुरु करण्यास) तसेच त्यास पाच वर्षाकरीता येणा-या रुपये २६९,५०,३२,२४०/- एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रकल्पात समाविष्ट बाब निहाय खर्च खालीलप्रमाणे आहे.

| **सदर प्रकल्प पाच वर्षासाठी राबविण्याकरीता येणाऱ्या खर्चाचा तपशील** | | |
|---|---|---|
| A) CAPEX | | |
| Sr. No. | Item | Approx. Cost |
| १ | Software solution and Hosting NextGen e-Hospital | Free of Cost for ३ Years as stated by NIC |
| २ | Internal LAN Infrastructure | रु. ५०,०७,८०,५००/- |
| ३ | Hardware and Infrastructure | रु. २६,३२,४०,०००/- |
| | Total | **रु. ७६,४०,२०,५००/-** |
| B) OPEAX | | |
| १ | Human Resources | रु. ३१,२०,००,०००/- |
| २ | Internet Connectivity | रु. १६१,९०,११,७४०/- |
| | Total | **रु. १९३,१०,११,७४०/-** |
| | Total Cost = (A) CAPEX + (B) OPEAX | **रु. २६९,५०,३२,२४०/-** |

२. एन.आय.सी. (NIC) मार्फत उपलब्ध करुन देण्यात येणारी अज्ञावली (NextGen e-Hospital) प्रथम तीन वर्षासाठी नि:शुल्क उपलब्ध होणार आहे. सदर अज्ञावली ऑन बोर्ड करण्याकरीता कोणतेही शुल्क आकरण्यात येणार नाही.

३. सदर प्रकल्पासाठी आवश्यक लॅन जोडणीच्या पायाभूत सुविधा, संगणक व अन्य हार्डवेअर खरेदीकरीता उक्त बाबींचे विनिर्दिष्ट्ये माहिती व तंत्रज्ञान विभागाकडून मान्य करुन घेण्यासाठी संचालनालयाने प्रस्ताव सादर करावा. सदर बाबींच्या विनिर्दिष्टांना माहिती व तंत्रज्ञान विभागाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर, उक्त बाबींची खरेदी करण्यासाठी विहित पद्धतीचा अवलंब करुन GeM पोर्टलवर निविदा प्रक्रिया राबवून अथवा टर्न-की पद्धतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. एच. एम. आय. एस. प्रणाली अविरत सुरु राहण्यासाठी आवश्यक असणारे अतिकुशल, कुशल, अर्धकुशल व अकुशल मानव संसाधनांचा संस्थास्तरावर खर्च करण्यात येणार आहे. सदर मनुष्यबळ नॅशनल इन्फॉरमॅटीक्स सेंटर सर्व्हिसेस (NICSI) यांचे अधिकृत वा मान्यता प्राप्त पुरवठादार/महाआयटी/उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १४.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले पुरवठादार किंवा निविदा प्रक्रिया राबवून बाह्यस्त्रामार्फत उपलब्ध करुन घेण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. एच. एम. आय.एस करीता लागणारे लेखन सामग्री व तद्अनुषंगीक बाबींची खरेदी संबंधित संस्थेच्या मुळ मंजूर अनुदानातून उपलब्ध करण्यांत येणार असल्यामुळे, सदर बाबींच्या खर्चाचा समावेश यात करण्यात आलेला नाही.

६. वरील तक्त्यातील OPEX शिर्षाखाली नमुद बाबींचा खर्च संस्थास्तरावर करण्यात येत असल्याने, उक्त बाबींकरीता संस्थानिहाय खर्चासाठी आवश्यक निधीच्या मागणीसाठी पुरवणी मागणीचा संस्थानिहाय प्रस्ताव सादर करावा.

७. सदर प्रकल्प सुरु करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन गट (Project Management Unit) स्थापन करण्याच्या सूचना मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने दिल्या आहेत. त्यानुसार प्रकल्प व्यवस्थापन गट स्थापन करण्याची कार्यवाही स्वतंत्र्यरित्या करण्यात येईल.

८. सदर प्रकल्पामधील CAPEX शिर्षाखालील खर्च वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या खालील लेखाशिर्षामध्ये उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा. तसेच OPEX शिर्षाखाली नमुद बाबींचा खर्च संबंधित संस्थांच्या लेखाशिर्षाखाली (३०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक एस-०१**

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१ - नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा राज्य योजनेंतर्गत योजना

(००)(०९)- वैद्यकीय महाविद्यालये व संलग्न रुग्णालयात आरोग्य सेवा

३० - इतर कंत्राटी सेवा (२२१० डी ९६२)

९. सदर प्रकल्पाबाबत आवश्यकतेनुसार शासन निर्णय / आदेश वेळोवेळी स्वतंत्र्यपणे निर्गमित करण्यात येतील.

१०. सदर शासन निर्णय मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक २४.०५.२०२३ रोजी पार पडलेल्या उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१४१५१०४५४८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH BABAN SURWASE

Digitally signed by PRAKASH BABAN SURWASE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=PRAKASH BABAN SURWASE
Date: 2023.07.14 02:57:43 -07'00'

**(प्रकाश सुरवसे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, उपमुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
५. मा. मंत्री (वै. शि.) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (माहिती व तंत्र विभाग), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
९. एन.आय.सी., मुंबई.
१०. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
११. सर्व अधिष्ठाता/वैद्यकीय अधिक्षक, शासकीय वैद्यकीय/दंत/आयुर्वेद महाविद्यालय.
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. निवडनस्ती/ प्रशासन-२